**पर्यटन धोरण - २०१६ तसेच वेगवेगळे प्रस्ताव तयार करणे, त्यांची छाननी करणे, अंमलबजावणी करणे व योजनांच्या अंमलबजावणी व संनियंत्रणासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिडीएस-२०१८/३/प्र.क्र.२५६/पर्यटन**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्राय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ जून २०१८

**वाचा :-**

१. शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांकः टिडिएस २०१०/८/प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.४ नोव्हेंबर २०१०.
२. शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र.टीडीएस-२०१५/११/प्र.क्र.१०२१/पर्यटन, दि.४ मे २०१६.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र.टीडीएस-२०१५/ ११/ प्र.क्र.१०२१/ पर्यटन, दि.४ मे २०१६ अन्वये महाराष्ट्राचे पर्यटन धोरणास मान्यता देण्यात आलेली आहे. या पर्यटन धोरण २०१६ च्या सर्वसमावेशक धोरणाची पुढील वैशिष्ट्ये आहेत.

**(क)** पर्यटनक्षम भौगोलिक क्षेत्रांना –पर्यटन क्षेत्र॰ म्हणून घोषित करणे व त्या क्षेत्रांचा विशेष पर्यटन आराखडा तयार करुन विविध पर्यटन स्थळ व सुविधांचा विकास घडवून आणणे. ( उदा. अजिंठा, वेरूळ, एलिफंटा, सिंधुदूर्ग, औरंगाबाद, नागपूर, जुन्नर इ.)

**(ख)** संकल्पनेवर आधारीत (theme based) पर्यटन क्षेत्रांचा विकास करणे. ( उदा. कृषी पर्यटन, सागरी किनारा पर्यटन, साहसी पर्यटन, वारसा पर्यटन (heritage tourism) इ.)

**(ग)** गुंतवणुक किंवा रोजगार निर्मितीच्या निकषावर पर्यटन क्षेत्रातील खाजगी प्रकल्पाला / क्षेत्राला पर्यटन प्रकल्पाचा दर्जा देवून पर्यटन धोरण २०१६ नुसार विविध सवलती देणे.

त्याशिवाय महाराष्ट्र शासनाच्या पर्यटन विभागाच्या प्रादेशिक पर्यटन विकास योजनेच्या अंतर्गत अशा प्रकारच्या पर्यटन स्थळी पर्यटक आकर्षित करण्यासाठी, त्यांना सुखद अनुभव देण्यासाठी, पर्यटकांसाठी सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी, तेथे मुलभूत इन्फ्रास्ट्रक्चर उपलब्ध करुन देण्याचा मानस आहे. तसेच पर्यटन विकासास चालना देवून देशातील व देशाबाहेरील देशी-

विदेशी पर्यटकांना आकर्षित करणे, स्थळ व संकल्पनेवर आधारीत पर्यटनाची पणन व प्रसिद्धी करणे, या सर्वांना चालना देण्यासाठी शासनामार्फत पर्यटन संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे. या पर्यटन संचालनालयाला योग्य दिशा व गती देण्यासाठी पर्यटन क्षेत्रातील जागतिक स्तरावरचा व्यवसायाभिमुख दृष्टीकोण आणि पद्धतींचा वापर करणे क्रमप्राप्त झाले आहे. यासाठी पर्यटन संचालनालयाच्या बळकटीकरणासाठी राज्यस्तरीय -पर्यटन प्रकल्प, नियोजन, आखणी, अंमलबजावणी व संनियंत्रण युनिट॰ गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंबंधी देशातील इतर राज्यातील व देशाबाहेरील या क्षेत्रातील अभ्यास करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. पर्यटन क्षेत्रात आवश्यक असलेला व्यवसायाभिमुख दृष्टीकोन ठेवून पर्यटन संचालनालयाला दिशा व गती देण्यासाठी राज्यस्तरीय “पर्यटन प्रकल्प नियोजन, आखणी, अंमलबजावणी व संनियंत्रण” युनिट स्थापित करण्यात येत आहे. या युनिटमध्ये आदरातिथ्य, पर्यटन प्रवास, ब्रँडींग, राज्याच्या पर्यटनाचे पणन व प्रसिद्धी, डिजीटल प्रेझेन्स, होम स्टे, मानव संसाधन विकास, वित्तिय प्रबंधन, इ. क्षेत्रातील दर्जेदार सल्लागारांचा समावेश राहील. त्याशिवाय विविध पर्यटन संकल्पनेवर आधारित (Theme Based) क्षेत्रातील सल्लागारांची आवश्यकतेनुसार नेमणूक करण्यात येईल. या युनिटची सविस्तर व्याप्ती, अटी व शर्ती, संरचना, कार्यपद्धती इ. बाबत सविस्तर प्रस्ताव तयार करण्यासाठीची जबाबदारी KPMG सल्लागार संस्थेकडे सोपविण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या योजना ( उदा. स्वदेश, प्रसाद इ. ), राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय संस्थेशी निगडीत योजना आणि राज्याच्या पर्यटन विभागाच्या प्रादेशिक पर्यटन विकास योजना राबविण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे, त्याच्याशी निगडीत कार्यवाही करणे, तांत्रिक तपासणी करणे व त्या तपासणीनंतर प्रशासकीय मान्यतेसाठी योग्य तो प्रस्ताव सादर करणे व मान्यतेनंतर त्याच्या अंमलबजावणीची रूपरेषा आखणे व त्या कामावर प्रकल्प व्यवस्थापन (Project management) शास्त्राप्रमाणे देखरेख व संनियंत्रण ठेवण्यासाठी राज्यस्तरीय प्रकल्प नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण समिती ( Project Planning, Implementation and Monitoring

Committee ) ची पुढीलप्रमाणे स्थापना करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय प्रकल्प नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण समिती**
**( Project Planning, Implementation and Monitoring Committee )**

| | | |
|---|---|---|
| १. प्रधान सचिव, पर्यटन | - | अध्यक्ष |
| २. वित्त विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३. नियोजन विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य. |
| ४. सार्वजनिक बांधकाम विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य | - | सदस्य सचिव |
| ६. आवश्यकतेनुसार पर्यटन क्षेत्रातील तज्ञ | - | निमंत्रित सदस्य |

**(अ)** सदर समितीकडे वरिलप्रमाणे नमूद केलेल्या योजनेशिवाय राज्य शासन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडून प्रसिद्धी लेखाशिर्षाखाली तयार केलेल्या प्रसिद्धी, पणन व माध्यम आराखड्याची तपासणी करुन शासनाच्या पर्यटन विभागास मान्यतेसाठी सादर करणे, हे काम सोपविण्यात येत आहे.

**(ब)** सदर समिती प्रादेशिक पर्यटन विकास योजनेंतर्गत प्रशासकीय व निधी मंजूरीसाठी प्रकल्प अहवाल तयार करेल आणि प्राप्त झालेल्या प्रकल्प अहवाल व प्रस्तावांबाबत राज्य पर्यटन विकास समितीस शिफारस करेल.

**(क)** राज्यस्तरीय प्रकल्प नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण समितीस ( Project Planning, Implementation and Monitoring Committee ) पर्यटन क्षेत्रातील तज्ञांना बैठकीस निमंत्रित करता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२७१५४५२०५९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra
Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae5e5678dc8c9d9c01f7043448a53f6a9fbe81e46d183af43c9a9e01eb42c7c7, serialNumber=93c11f919f0c5fba6953b4841cc8cfd46b2b788da139e3f21b3d79d2cf976efa, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2018.06.27 15:51:06 +05'30'

**( र.ल.लखोटे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य
१०.सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी
१५.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
१६.सर्व मंत्रालयीन विभाग
१७.सर्व कार्यासने, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

***